सेवानिवृत्ती/स्वेच्छानिवृत्ती/राजीनामा/मृत्युमुळे
रिक्त होणारी पदे भरण्याबाबत....
शासकीय सेवेत अनुकंपा तत्वावर नियुक्ती देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
शासन निर्णय क्रमांक-बीजीटी-१०.०१/प्र.क्र. १७/२००१/अर्थसंकल्प-१९.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक ७.४.२००१.

वाचा :- १) शा.नि.वि.वि.क्र.बीजीटी-१०००/प्र.क्र.१३/अर्थसंकल्प-१९, दि.१.३.२०००.
२) शा.नि.वि.वि.क्र.बीजीटी-१०००/प्र.क्र.१३/अर्थसंकल्प-१९, दि.२९.६.२०००.
३) शा.नि.वि. वि.क्र.बीजीटी-१०००/प्र.क्र.१३/२०००/अर्थसंकल्प-१९, दि.१६ जानेवारी २००१.
४) शा.नि.सा.प्र.वि.क्र.अकंपा-१०००/प्र.क्र.२०/२०००/आठ, दि.२८.३.२००१.

## शासन निर्णय

सेवानिवृत्ती, स्वेच्छानिवृत्ती, राजीनामा किंवा मृत्यू यापैकी कोणत्याही घटनेमुळे १.३.२००० पासून रिक्त होणारी पदे शासनाच्या मान्यतेशिवाय भरु नयेत असे आदेश दि.१.३.२००० च्या संदर्भाधीन अ.क्र.१ अन्वये निर्गमित करण्यात आलेले आहेत, तसेच संदर्भाधीन क्र.२ च्या दिनांक २९.६.२००० च्या शासन निर्णयान्वये मागासवर्गीयांचा अनुशेष भरण्यासाठी, प्रकल्पग्रस्त व अनुकंपा तत्वावर पदे भरावयाची असल्यास त्या प्रकरणी शासन निर्णय, दिनांक १.३.२००० चे आदेश लागू होणार नाहीत अशी सुधारणा करण्यात आली होती.

२ (१) अनुकंपा तत्वावरील नियुक्त्यासंबंधातील प्रचलित कार्यपध्दतीत बदल करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. या संदर्भात सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधीन क्र.३ च्या शासन निर्णयान्वये अनुकंपा तत्वावरील नियुक्त्यांसंबंधातील कार्यपध्दतीत काही बदल केलेले असून आदेश निर्गमित केलेले आहेत.

(२) सदर आदेशाच्या अनुषंगाने आता शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक २९.६.२००० च्या तरतुदीत खालीलप्रमाणे सुधारणा करण्याचे शासन निदेश देत आहे-

(अ) उपरोक्त संदर्भाधीन (दिनांक २९.६.२००० च्या) शासन निर्णय क्र.२ मधील परिच्छेद-७ मध्ये अनुकंपा तत्वावर भरावयाच्या पदांना दिलेली सवलत या आदेशाद्वारे सुधारित करण्यात येत आहे.

(ब) अनुकंपा तत्वावरील गट "क" व गट "ड" मधील पदांवर नेमणुका देताना अशा नेमणुका शासनाच्या पूर्व मान्यते शिवाय करण्यात येऊ नयेत. तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन अनुक्रमांक ३ येथील दिनांक २८.३.२००१ मधील आदेश अशा नेमणुकांना लागू राहतील.

[कृ-मा-प.

(३) हे आदेश दिनांक २८ मार्च २००१ पासून अंमलात येतील. सर्व मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, त्यांनी आपल्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सार्वजनिक क्षेत्रातील सर्व उपक्रम, मंडळे, महामंडळे, सर्व शासकीय, निमशासकीय संस्था इत्यादी यांनाही हे आदेश लागू होत असल्यामुळे त्यांना या निर्णयाची प्रत पाठविण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

चित्कला झुत्शी
शासनाचे प्रधान सचिव,
वित्त विभाग

प्रति,
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
उप मुख्यमंत्री यांच सचिव.
सर्व मंत्र्यांचे व राज्यमंत्र्यांचे खाजगी सचिव.
मंत्रालयीन विभागांचे सर्व प्रधान सचिव/सचिव.
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा), मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा), नागपूर.
संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
मंत्रालयाच्या निरनिराळया विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयाचे प्रमुख.
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व जिल्हाधिकारी.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
सर्व आयुक्त, महानगरपालिका.
सर्व मुख्याधिकारी, सर्व नगरपालिका/नगरपरिषदा.
कुलसचिव, सर्व विद्यापीठे.
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
*प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त, मुंबई.
*सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई. क
*प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.
*प्रबंधक, अपिल शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.
*सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई.
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवडनस्ती, अर्थसंकल्प-१९.

* पत्राने